Read India Books

# जादूची पूड

ब्रह्मी लोककथा

• मूळ इंग्रजी : ग्रेस्ट्रोक •
• मराठी रूपांतर : अविनाश पंडित •
• चित्रांकन : पी. जी. दिनेश •




• THE MAGIC POWDER •



First edition: 2005

Story & Design: *Greystroke*
Illustration: *P G Dinesh*
Content & Concept: *Wheitstone Productions*
*156, Kambar Street, Annai Indira Nagar*
*Velachery, CHENNAI - 600 042*
Marathi Translation: *Avinash Pandit*

ISBN: 81-8263-210-2

Registered Office
*PRATHAM BOOKS*
930, 4th Cross, 1st Main, MICO Layout, Stage 2,
Bangalore - 560 076

Regional Offices in Mumbai and New Delhi

Printed by
*SHUBHODAYA PRINTERS*
Bangalore

Published by
*PRATHAM BOOKS*
www.prathambooks.org





# जादूची पूड

ब्रह्मी लोककथा



• मूळ इंग्रजी : ग्रेस्ट्रोक •

• मराठी रुपांतर : अविनाश पंडित •

• चित्रांकन : पी. जी. दिनेश •





कोणे एके काळची गोष्ट. इरावती नदीच्या काठी एका छोट्याशा खेड्यात थुजा नावाची तरुणी राहत असे. थेंगी नावाच्या देखण्या तरुणाशी तिचा सुखी संसार सुरू होता. पण तिला एक चिंता सतावत होती. तिचा नवरा स्वतःला किमयागार समजत असे. तो सदा कचऱ्यापासून सोने तयार करण्याच्या स्वप्नामध्ये बुडून गेलेला असे. रात्रं-दिवस आणि महिनोन् महिने तो यावर प्रयोग करण्यात मग्न असे.

आपल्याला एक दिवस फार मोठे यश मिळेल असे थेंगीला वाटत असे. लवकरच त्यांच्याकडचे सर्व पैसे संपले आणि रोजचे दोन घास मिळवण्याला थुजास खूप संघर्ष करावा



लागत असे. साहजिकच तिला खूप काळजी वाटू लागली.

थुजाने आपल्या नवऱ्यास सुचवले, ''अशा प्रकारे घर चालवणे अवघड आहे. तू आता लवकरच एक नोकरी शोध.'' पण थेंगी ऐकायला तयार नव्हता. ''मी आता यशाच्या खूप जवळ आहे. अशा वेळी मी नोकरी का शोधू? कोणी कल्पना देखील करू शकणार नाही इतके आपण श्रीमंत होणार आहोत.''

थुजा निराश झाली आणि आपल्या वडिलांकडे गेली. तिचे वडील, थेट, एक चतुर माणूस होता. थुजाने वडिलांना आपली समस्या सांगितली. आपला जावई किमयागार आहे हे





ऐकून थेट यांना खूप आश्चर्य वाटले. त्यांनी थोडा विचार केला आणि आपल्याला भेटण्यास थेंगीला पाठवून दे असे तिला सांगितले.
थुजा समाधानाने घरी परतली. तिला खात्री होती की आपले वडील थेट निश्चितच एक उपाय काढतील.
दुसऱ्या दिवशी थेंगी आपल्या सासऱ्याच्या घरी आला. सासरे आपली खरडपट्टी काढतील असे त्याला वाटले होते. पण प्रत्यक्षात वेगळेच काही घडले. थेट यांनी त्याला बाजूला नेले व पुटपुटले, ''लहानपणी मी सुद्धा तुझ्यासारखा किमयागारच होतो.'' त्यानंतर दुपारभर त्या दोघांनी थेंगीच्या कामाबद्दल चर्चा केली.
शेवटी थेट उभे राहिले आणि म्हणाले, ''थेंगी, मी तुझ्या वयाचा असताना जे काही केले होते ते सर्व तू केले आहेस. खरेच, तू आता यशाच्या उंबरठ्यावर आहेस. तुझे अभिनंदन ! पण एक महत्त्वाची वस्तू तू तुझ्या प्रयोगात वापरलेली नाहीस असे दिसते. कचऱ्यापासून सोने तयार करताना शेवटच्या टप्प्यामध्ये तुला याची गरज



लागेल हे मला नुकतेच उमजले. पण काय करू? मी आता खूप म्हातारा झालो आहे. या कामासाठी लागणारी मेहनत मी करू शकणार नाही...''

थेंगी उत्साहाने म्हणाला, ''ती वस्तू कोणती आहे ते मला सांगा. तुमच्यासाठी ती वस्तू मी मिळवून देईनच.'' अखेर आपल्या प्रयत्नांची फळे लवकरच मिळणार आहेत असे त्याला वाटू लागले.

''तुझ्यात उत्साह संचारला हे खूप छान झाले,'' थेट म्हणाले. ''मुला, ती रहस्यमय वस्तू म्हणजे फक्त केळीच्या पानांवरची आढळणारी चांदीची पूड होय. त्यासाठी तुला स्वत: केळीची झाडे लावावी लागतील आणि त्यांच्यावर काही मंत्रोपचार करावे लागतील. मग ती झाडे जशी वाढतील तशी त्यांच्या पानांवरची पूड परिणामकारक होईल.''

''अशी किती पूड आपल्याला लागेल ?'' थेंगीने विचारले.

थेट यांनी किती लागेल ते सांगितले.



''एवढी !'' थेंगी आश्चर्याने ओरडला ''अहो, त्यासाठी तर केळीची शेकडो झाडे लागतील !''

''मुला, म्हणूनच मी भीत होतो की हे काम माझ्या हातून कसे होणार ?''

''तुम्ही काही काळजी करू नका बाबा !'' थेंगी उत्तरला. ''मी हे काम करीन.''

संध्याकाळी म्हाताऱ्या थेटने आपल्या जावयाला जादूचे मंत्र शिकवले व केळीचे बाग तयार करण्यासाठी काही पैसे उसने दिले.

दुसऱ्याच दिवशी थेंगीने आपल्या घराजवळ जमिनीचा एका लहान तुकडा विकत घेतला आणि त्याची साफसफाई केली. जमिनीत खड्डे खणून, सूचना मिळाल्याप्रमाणे, जादूने भारलेले मंत्र उच्चारत त्याने केळ्याची रोपे काळजीपूर्वक लावली. दररोज तो शेतावर जाऊन रोपांची निगा राखत असे. तण काढणे व कीटकनाशके फवारणे अशी कामे तो आनंदाने करत असे. जेव्हा रोपे मोठी होऊन त्यांना केळी लागू लागली तेव्हा पानांवरील चांदीची पूड त्याने काळजीपूर्वक गोळा करून एका पेटीत ठेवली.



मात्र ती पूड खूपच कमी होती म्हणून थेंगीने आणखी जमीन खरेदी केली व त्यावर पुन्हा खूप केळीची रोपे लावली. हवी तेवढी पूड मिळवीनच अशी त्याने जिद्द ठेवली होती.
अनेक वर्षांच्या प्रयत्नांनी थेंगीला पाहिजे तेवढी पूड मिळाली.
खूपच उत्साहाने थेंगी आपल्या सासऱ्याच्या घरी पोहोचला. आता त्याला लवकरच कचऱ्यापासून सोने बनवता येणार होते.
''बाबा, हे पहा. शेवटी हवी तेवढी जादूची पूड मी मिळवलीच,'' थेंगी उद्गारला.
थेट खूष झाले. ''सुंदर, खूपच छान ! शेवटी तू ते मिळवलेसच. थेंगी, मला तुझा खूप अभिमान वाटतो. आता मी तुला कचऱ्यापासून सोने कसे बनवायचे ते दाखवतो. पण त्यासाठी आपल्याला थुजाची मदत लागेल. आपण तिला बोलावूया.''
थेंगी थोडासा गोंधळला. पण वेळ न दवडता पळतच जावून तो आपल्या बायकोला घेऊन आला.
''थुजा, जेव्हा तुझा नवरा जादूची पूड गोळा



करत असे तेव्हा तू त्या केळ्यांचे काय करत होतीस ?''  थेट यांनी तिला बघून विचारले.
''का बरे बाबा ? मी सर्व केळी विकून आणि त्याच्यातूनच घर चालवत असे,'' थुजा म्हणाली.
''तसे असेल तर तू काही पैसे पण शिल्लक टाकले असशील ना ? कारण थेंगी भरपूर केळी पिकवत असे,'' थेट बोलत होते.
''हो,'' थुजाने दुजोरा दिला.
''आम्ही ते पाहू शकतो काय?'' थेटने प्रश्न केला.
''अवश्य, ते सर्व मी घरी जपून ठेवले आहेत.''
ते तिघेही थेंगीच्या घरी गेले. आपण जपून ठेवलेली काही पोती थुजाने माळ्यावरून खाली उतरवली. थेटने ती पोती उघडून, त्यात आत





डोकावून पाहिले आणि हसला. यातले एक पोते त्यांनी टेबलावर ओतले.

ओह... सोन्याच्या चमचमणाऱ्या नाण्यांचा ढीगच तेथे पडला !

नंतर शेतामध्ये जाऊन थेट एक ओंजळभर माती घेऊन आले आणि नाण्यांच्या बाजूस त्यांनी ती माती ठेवली.

थेंगीकडे पाहत थेट म्हणाले, '' थेंगी, हे पहा, तू कचऱ्यामधून सोने काढून दाखवले आहेस !''

आश्चर्यात बुडून गेलेला थेंगी आता अत्यंत खूष झाला. तो आता मोठा श्रीमंत झाला होता !

त्यानंतर पुन्हा कधीही थेंगीने जादूची पूड केळीच्या पानांवरून गोळा केली नाही. पण केळींची शेती त्याने चालूच ठेवली. कचऱ्यातून सोने काढायची अत्यंत सरळ आणि चांगला धडा त्याच्या 'किमयागार' सासऱ्याने त्याला घालून दिला होता.

थेंगीला पुन्हा कधीच जादुच्या पुडेची गरज लागली नाही.





# जादुचे केळे

थेंगीने पाहिलेली केळीच्या पानावरची जादुची पूड आश्चर्यकारक होती ना ? आता तुमच्या मित्रांना जादूच्या केळीचा आश्चर्यजनक खेळ दाखवणार कां? त्यांना सांगावे की एक नवीन प्रकारचे केळे नुकतेच शोधून काढले आहे. गंमत म्हणजे ते केळे आतूनच कापलेले आहे !



## जादुचे केळे तुम्हीच बनवा

ही जादू करण्यासाठी तुम्हास काही चांगली पिकलेली केळी, आणि एक सुई किंवा दातकोरणे हवे.





आता प्रयोग असा करावा :

1) केळ्याच्या एका बाजूने सुई आत टोचावी.




2) सुई बाहेर न काढता हळूवारपणे केळ्याच्या आतूनच उजव्या आणि डाव्या बाजूस फिरवावी. सालाच्या बाजूला भोक न पाडता केळ्याच्या आतल्या भागाचा तुकडा पडेल असे पाहावे. म्हणजे आतल्या आतच केळ्याचा तुकडा पडलेला असेल.




3) हळूवारपणे सुई बाहेर काढावी आणि एक एक इंचाच्या अंतरावर अशाच प्रकारे सुई टोचून कापत राहावे. असे पाच किंवा सहा वेळा करावे.




4) आता हे पाहा ! आपले जादूचे केळे खाण्यास आपण तयार झाला आहात !! ह्या नवीन शोधाची गंमत सांगत आपल्या मित्रांना म्हणावे की तुम्ही ''हे केळे शेजारच्या बागेत पाहिलेत!'' केळ्याची साल काढली नसूनही आतून तुकडे होऊन झालेलेल्या फळाबद्दल जेव्हा तुमचे मित्र आश्चर्य व्यक्त करतील तर किती मजा येईल !



कोणे एके काळी, इरावती नदीच्या काठी थुजा आणि तिचा पती थेंगी राहत होते. या दोघांचा संसार आनंदात सुरु होता. पण एकच चिंतेचे कारण होते. थेंगी कचऱ्यातून सोने तयार करण्याच्या प्रयोगामध्ये सदैव गढून गेला असे. थेंगी यशस्वी झाला का ?



• JAADUCHI POOD •

PRATHAM BOOKS

MRP: Rs. 20.00

